महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी या योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील रेडिओ वरील जाहिरातीकरीताचे देयक अदा करण्याकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-राअआ-२०२०/प्र.क्र.५६/का-९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १२ ऑक्टोबर,२०२०.

**वाचा:-** (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि१६.४.२०२०

## प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयामार्फत “राज्यातील अल्पसंख्याकांच्या समस्यांबाबत संशोधन, अल्पसंख्याकांशी निगडीत बाबी हाताळणारे प्रशासनातील अधिकारी / कर्मचाऱ्यांना प्रशिक्षण व राज्य शासनाने अल्पसंख्याकांसाठी घोषित केलेल्या योजनांना प्रसिध्दी” या योजनेकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात अल्पसंख्याक विदयार्थ्यासाठी असलेल्या आयटीआय व पॉलिटेकनिक मध्ये प्रवेश घेण्यासाठी अल्पसंख्याक विदयार्थ्यांना उदयुक्त करण्यासाठी आकाशवाणी वरुन प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातीचे देयक अदा करण्याकरीता मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक “मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१८७) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशीर्षांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता रु.१०,००००००/- (अक्षरी रू. दहा कोटी फक्त) एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० करिता सदर मंजूर निधीच्या १० % निधी मर्यादेपर्यंत वितरीत करण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि शासन निर्णय वित्त विभाग दि.४.५.२०२० अन्वये वेतन व निवृत्ती वेतन वगळता इतर

कार्यक्रमावरील अनुदान वितरीत करण्यापूर्वी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक आहे. त्यानुसार अल्पसंख्याक समुदायातील विदयार्थ्यांना अल्पसंख्याक विदयार्थ्याकरीता असलेल्या आयटीआय व पॉलिटेकनिक मध्ये प्रवेश घेण्यासाठी उदयुक्त करावे या करीता आकाशवाणी वरून जाहिरात प्रसिध्द करण्यात आली. सदर जाहिरातीकरीता रु.१४,८२,३०६/- एवढा निधी खर्च करण्यास वित विभागाने मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन सदर जाहिरातीचे देयक रु.१४,८२,३०६/- अदा करण्याकरीता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी या योजनेकरिताच्या उपलब्ध तरतूदीमधून **रु.१४,८२,३०६/- (अक्षरी चौदा लक्ष ब्याऐशी हजार तीनशे सहा फक्त** ) एवढा निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी खर्च विहीत मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी.

२. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) तसेच संदर्भ क्र. १ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतूदींचे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने करावे.

३. उपरोक्त रक्कम “मागणी क्र. झेड ई-१, मुख्य लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाज कल्याण २०० व इतर कार्यक्रम (०१) अल्पसंख्याकांना सहाय्य (०१) (१२) संशोधन, प्रशिक्षण व योजनांना प्रसिध्दी यासाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) (२२३५-ए-१८७) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

४. “ सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकातील सर्व परिच्छेद व त्यासोबतच्या परिशिष्टामधील अटींची पूर्तता करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१२१६१९१०३२१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.10.12 17:24:24 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा.मंत्री (अ.वि.)/ मा.राज्यमंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
१२) कक्ष अधिकारी (कार्यासन- ७ ), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) निवडनस्ती (कार्यासन-९)